मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र. ८९२८/२०१५ यामध्ये दि. ०६/०७/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने आरोग्य सेवा आयुक्तालय कार्यालयातील गट-"क" व गट-"ड" या संवर्गातील कर्मचारी यांच्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय, क्रमांकः असंप-२०२०/प्र.क्र.२९ /आरोग्य ३

१० वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ११ जानेवारी, २०२२.

वाचा :

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.१८७ऐ/१६-ब, दिनांक ३०/६/२०२० व दिनांक २८/९/२०२०

३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.असंप-२०२०/प्र.क्र.२९/आरोग्य-३, दिनांक-०५/०१/२०२१.

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक-२८/१०/२०२१.

५) आरोग्य सेवा संचालनालय, पुणे कार्यालय यांचे पत्र क्र.आसेआ/ आस्था/कक्ष-५/टे-३/ अधिसंख्य नियुक्तया/मुदतवाढ/२३२३-२८/२१, दि.२१.१२.२०२१

प्रस्तावना :

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र.८९२८/२०१५ (चेअरमन आणि मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दिनांक ६/७/२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध

ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी, रिट याचिका क्र.३१४०/२०१८ मध्ये दि.२८/९/२०१८ च्या आदेशान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि.३१/१२/२०१९ पर्यत कार्यवाही करण्याचे आदेश दिले असल्याने अशा कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिसंख्य पदावर कर्मचारी यांना वर्ग करण्याची कार्यवाही करण्याची सूचना दिली आहे. त्यास अनुसरुन आरोग्य सेवा आयुक्तालयाच्या कार्यालयांच्या आस्थापनेवर दिनांक ०१.१२.२०२० ते दिनांक ३१.१०.२०२१ पर्यंत ११ महिन्याच्या कालावधीसाठी उपरोक्त संदर्भ क्र ३ अन्वये एकूण २५९ इतके अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली असून, त्यातील आयुक्तालय कार्यालयातील फक्त ४ कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदांना पुढील ११ महिन्याच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

अनुसुचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले, अनुसुचित जमातीचा दावा सोडून दिलेले, जात पडताळणी समितीकडे प्रस्ताव सादर न केलेले, जात पडताळणी समितीच्या निर्णयाविरोधात मा.न्यायालयात याचिका दाखल केलेले मात्र मा.न्यायालयाने स्थगिती न दिलेले व जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेल्या गट-क व गट-ड या संवर्गातील आयुक्तालयातील ४ कर्मचाऱ्यांना सोबतच्या विवरणपत्रात नमुद केलेल्या कार्यालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे. सदर पदांचा तपशील सोबतच्या विवरणपत्र-१ मध्ये नमूद केला आहे.

२. सदर अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे कर्मचा-यांपैकी सेवेत कार्यरत कर्मचारी, सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाकरिता निर्माण करण्यात आलेले अधिसंख्य पद तात्पुरत्या रुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत, यांपैकी जे आधी घडेल त्या दिनांकापर्यंत सदर अधिसंख्य पद अस्तित्वात राहील.

३. सदर कर्मचा-यांना अनुज्ञेय करावयाच्या सेवाविषयक / सेवानिवृत्तीविषयक लाभांबाबत शासनाने नेमण्यात आलेल्या अभ्यासगटाच्या निर्णयाच्या अनुषंगाने लाभ अनुज्ञेय होतील.

४. सोबतच्या विवरणपत्र १ मध्ये नमूद केलेल्या कार्यालयांच्या आस्थापनेवर एकूण ४ कर्मचाऱ्यांना यांसंदर्भात यापूर्वी पासून ११ महिन्याच्या म्हणजे दिनांक ०१.१२.२०२० ते दिनांक ३१.१०.२०२१ या कालावधीसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांना दिनांक ०१.११.२०२१ पासून दिनांक ३०.०९.२०२२ पर्यंत या ११ महिन्याच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

५. अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात कार्यरत आहेत त्या-त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९ मधील तरतुदीनुसार व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २८/१०/२०२१ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारान्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२८१७१५१७६७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=685cbbb5899027ea29d44ae02d12f2c1313143ad8376755d0e815a1eb20fd0ce, cn=Roshani Dinesh Kadam Patil
Date: 2022.01.12 14:31:01 +05'30'

**( रो.दि.कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र १/ २, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

२) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

३) संचालक, आरोग्य सेवा मुंबई/पुणे.

४) सहसंचालक,आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व जलजन्य रोग)/(कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे-६

५) सहसंचालक, आरोग्य सेवा (नेत्र) मुंबई.

६) उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रृषा) मुंबई.

७) उपसंचालक, आरोग्य सेवा (आमाजिआ/परिवहन/राज्य आरोग्य प्रयोगशाळा) पुणे.

८) सर्व उप संचालक, आरोग्य सेवा मंडळे.

९) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय

१०)सर्व जिल्हा हिवताप अधिकारी

११) सर्व संबंधित कोषागर अधिकारी/ अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई

१२) निवडनस्ती (आरोग्य ३)

# विवरणपत्र-१

| संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांच्या आस्थापनेवर कार्यरत गट-क निम्नलिखीत कर्मचा-यांकरिता निर्माण करण्यात येणारी अधिसंख्य पदे | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | अ. क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | गट | संबंधित कर्मचारी यांचेसाठी निर्माण करण्यात येणाया - अधिसंख्य पदाचे पदनाम | नियुक्तीचा दिनांक | अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांक | अधिसंख्य पदावर देण्यात येणारे मासिक वेतन |
| १ | १ | श्री.वासुदेव भनारकर | क | अधिक्षक | १५/७/१९९१ | - | ५५१००/- |
| २ | २ | श्री.प्रमोद पाटील | क | अधिक्षक | १८/१/१९९४ | - | ५५१००/- |
| ३ | ३ | श्रीम.तिलोत्तमा कोळी | क | सहा.अधिक्षक | १३/३/१९९२ | - | ३९९००/- |
| ४ | ४ | श्री चंद्रशेखर नामदेवराव अवझे | क | कनिष्ठ लिपिक | ११/०७/१९९५ | - | ३६१००/- |